चौथी माला मराठी

# बालभारती

## इयत्ता दुसरी



# भाषिक खेळ – १

खाली दिलेल्या चित्रांसमोरच्या शब्दांतील 'र' हरवलेला आहे. त्याचा योग्य आकार व योग्य जागा शोधा व खालील शब्द पूर्ण करा.

| चित्रे | शब्द | चित्रे | शब्द |
| --- | --- | --- | --- |
|  | सूय<br>.................. |  | चंद<br>.................. |
|  | पवत<br>.................. |  | समुद<br>.................. |
|  | टक<br>.................. |  | डम<br>.................. |
|  | कै या<br>.................. |  | कुना<br>.................. |

शिक्षण खात्याचा मंजुरी क्रमांक : पापुमं/१०९७/१७१७४/२ - भाषा/स.पु. दि. १४.३.९७

# मराठी

# बालभारती

## इयत्ता दुसरी

नाव ____________________

शाळा ____________________

इयत्ता ____________ तुकडी ____________



महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

प्रथमावृत्ती : १९९७
सुधारित आवृत्ती : २०००
पाचवे पुनर्मुद्रण : २००५



| | | |
|---|---|---|
| मराठी भाषा समिती | : | प्राचार्य राम शेवाळकर, अध्यक्ष<br>श्री. व. द. देसाई, सदस्य<br>श्री. ह. गं. नारलावार, सदस्य<br>श्रीमती रेणू दांडेकर, सदस्य<br>श्रीमती वर्षा सहस्रबुद्धे, सदस्य<br>श्रीमती शीला गुर्जरपाध्ये, निमंत्रित सदस्य<br>श्री. माधव राजगुरू, सदस्य-सचिव |
| संयोजन प्रमुख | : | माधव राजगुरू, विशेषाधिकारी, मराठी विभाग |
| सहायक | : | श्रीमती उषादेवी देशमुख, विषय सहायक मराठी |
| चित्रकार | : | श्री. श्रीमंत वि. होनराव |
| मुखपृष्ठ | : | श्री. चारुहास पंडित |
| अक्षरजुळणी | : | संगणक विभाग, पाठ्यपुस्तक मंडळ,<br>'बालभारती', सेनापती बापट मार्ग, पुणे - ४११ ००४. |
| निर्मिती | : | श्री. प्रमोद शिरोडकर, मुख्य निर्मिती अधिकारी<br>श्री. कमलाकर आगास्कर, निर्मिती अधिकारी |
| कागद | : | ५८.५ x ८६ सेमी. ५७ जीएसएम, क्रिमवोव्ह |
| मुद्रणादेश | : | 2005-06 |
| मुद्रक | : | सुनिल बाईंडिंग ॲन्ड प्रिंटींग वर्क्स, वडाळा, मुंबई - ३१ |
| प्रकाशक | | प्रमोद शिरोडकर,<br>नियंत्रक,<br>पाठ्यपुस्तक निर्मिती,<br>गोरेगाव, मुंबई - ४०० ०६२. |

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत. माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन. मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन. माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करीत आहे. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्धी ह्यातच माझे सौख्य सामावले आहे.

## प्रस्तावना

'क्षमताधिष्ठित प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९९५' नुसार पाठ्यपुस्तक मंडळाने मराठी बालभारती, इयत्ता दुसरी हे पाठ्यपुस्तक १९९७ साली प्रकाशित केले. 'सरस-२००१' या प्रकल्पांतर्गत दुसरीच्या पुस्तकाची सुधारित आवृत्ती आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

दुसरीचे पाठ्यपुस्तक जास्तीत जास्त निर्दोष व दर्जेदार व्हावे, या दृष्टीने महाराष्ट्राच्या सर्व भागांतील प्राथमिक शिक्षक आणि विषयतज्ज्ञ यांच्याकडून या पुस्तकाचे **प्रकाशनपूर्व** समीक्षण करण्यात आले होते. पुस्तक आहे, त्यापेक्षा अधिक निर्दोष, अधिक दर्जेदार आणि अधिक प्रभावी होण्यासाठी पाठ्यपुस्तक मंडळाने **प्रकाशनोत्तर** समीक्षणाचा ***'सरस-२००१'*** हा संशोधन प्रकल्प हाती घेतला. या प्रकल्पात पुढील चार मार्गांनी पुस्तकाचे समीक्षण करण्यात आले :-

१. महाराष्ट्रातील निवडक शाळांकडून चाचणीद्वारे वर्षभर प्रत्याभरण घेणे;

२. विषयतज्ज्ञांकडून परीक्षण करून घेणे;

३. संस्था व व्यक्ती पातळीवर संशोधन प्रकल्प घेणे; आणि

४. शिक्षक, पालक यांच्याकडून आलेली पत्रे, वृत्तपत्रातून छापून आलेली टीकात्मक परीक्षणे यांतील सूचनांचा विचार करणे.

**सन १९९८-९९** या शैक्षणिक वर्षात वरील चारही मार्गांनी आलेल्या सूचना व अभिप्रायांचा विचार करून मराठी समितीने या पुस्तकाची सुधारित आवृत्ती या वर्षी तयार केली आहे.

शिक्षकांचे अध्यापन नेमके आणि अधिक प्रभावी व्हावे; म्हणून पाठांवरील प्रत्येक स्वाध्यायास क्षमता क्रमांक आणि आवश्यक तिथे शिक्षकांसाठी सूचना दिलेल्या आहेत.

शिक्षकांप्रमाणेच पालकही विद्यार्थ्यांच्या स्वयंअध्ययनात मदत करू शकतील असे या पुस्तकाचे स्वरूप ठेवले आहे. मराठी समिती व चित्रकार यांच्या आस्थापूर्वक परिश्रमातून हे पुस्तक तयार झाले आहे. मराठी समितीचे आणि पाठ्यपुस्तक लेखनामध्ये ज्या शिक्षकांचे, तज्ज्ञांचे सहकार्य लाभले, त्या सर्वांचे मंडळ मनःपूर्वक आभारी आहे.

पालक, शिक्षक आणि विद्यार्थी यांच्या दृष्टीने अधिक उपयुक्त अशा या सुधारित आवृत्तीचे सर्वांकडून स्वागत होईल, अशी आशा आहे.

पुणे
दिनांक : १ जानेवारी, २०००
११ पौष, शके १९२१

(एन. के. राठोड)
**संचालक**
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

# क्षमताधिष्ठित अभ्यासक्रम आणि पाठ्यपुस्तके

गेल्या चाळीस-पन्नास वर्षांत शिक्षणाचा प्रसार खूप झाला; पण गुणवत्तेबाबत शाळा-शाळांमध्ये, प्रांता-प्रांतांमध्ये फरक पडला. गुणवत्तेबाबत उद्‌भवलेल्या या प्रश्नावर क्षमताधिष्ठित अध्ययन-अध्यापन हा एक उपाय आहे. प्राथमिक शिक्षण घेणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला काय यायला हवे, याचा विचार म्हणजेच अध्ययन क्षमतांचा विचार. यात अशी अपेक्षा आहे,.की विद्यार्थ्यांनि जास्तीत जास्त क्षमता प्राप्त केल्या पाहिजेत. विद्यार्थ्यांच्या वर्तनात अपेक्षित बदल दिसून आला, तर त्याने संबंधित विशिष्ट क्षमता प्राप्त केली असे म्हणता येईल; मात्र हा बदल टिकाऊ स्वरूपाचा असला पाहिजे. हे टिकाऊ स्वरूपाचे बदल घडवूनच प्राथमिक शिक्षणात गुणात्मक सुधारणा करता येईल.

अभ्यासक्रमाच्या (क्षमताधिष्ठित प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९९५) विविध क्षेत्रांमध्ये क्षमतांच्या विकसनाचे जे टप्पे दर्शवलेले आहेत ते परस्परावलंबी आहेत, त्यातील संबंध लक्षात घेऊन पाठ्यपुस्तकाची श्रेणीबद्ध रचना करण्यात आलेली आहे; म्हणूनच प्रत्यक्ष अध्यापनाच्या वेळी पाठ्यपुस्तकातील क्रम तोच ठेवायचा आहे.

क्षमताधिष्ठित अध्यापन हा काही अध्यापनातील पूर्णतया नवीन प्रयोग किंवा नवीन सिद्धान्त नाही; परंतु आता अभ्यासक्रमात नमूद केलेल्या क्षमता, वर्गातील प्रत्येक विद्यार्थ्याला प्रभुत्व पातळीवर प्राप्त झाल्या पाहिजेत, यासाठी प्रयत्न करायचे आहेत. अपेक्षित कृती विद्यार्थ्याला अचूकतेने, सहजतेने आणि योग्य त्या गतीने करता आली, म्हणजे त्याने संबंधित क्षमतेची प्रभुत्व पातळी गाठली असे म्हणता येईल. पाठ्यपुस्तकाचा वापर क्षमतेवरील प्रभुत्वासाठी करायचा आहे. त्यासाठी पाठ्यपुस्तकातील सामग्रीबरोबरच शिक्षकाने स्वत: तयार केलेले साहित्यही वापरणे अपेक्षित आहे.

शिक्षकांचा हेतू केवळ पाठ्यपुस्तक संपवणे असा असता कामा नये, वर्गातील सर्व विद्यार्थ्यांना विशिष्ट क्षमता प्राप्त करून देणे हा हेतू असावा. जरूर तेथे अध्यापनाचा वेग कमी-जास्त करून तसेच उजळणी, नवीन उपक्रम, विविध स्वाध्याय इत्यादींचा वापर करून तो साध्य करायचा आहे.

वर्गातील सर्व विद्यार्थी विशिष्ट क्षमतेकडे बरोबरीने जावेत, यासाठी पाठ्यपुस्तकात अनेक प्रकारचे स्वाध्याय, उपक्रम आणि कृती दिलेल्या आहेत. त्या कशा घ्यायच्या याच्या सूचनाही दिलेल्या आहेत. विद्यार्थी क्षमता संपादनाच्या कोणत्या टप्प्यावर आहेत आणि संपादन केलेली क्षमता टिकून आहे की नाही, याचे मूल्यमापन सातत्याने करायचे आहे. एखादी क्षमता प्राप्त झाली नाही किंवा टिकून राहिली नाही असे आढळल्यास उपचारात्मक उपक्रमांची सोय केली पाहिजे. पाठ्यपुस्तकात नमुना चाचणी प्रश्न दिले आहेत. त्या प्रश्नांचा तसेच त्या धर्तीवर तयार केलेल्या जास्तीच्या प्रश्नांचा शिक्षकांनी वापर करावा. क्षमताधिष्ठित अध्यापनाचा आणखी एक विशेष म्हणजे प्राप्त झालेल्या क्षमतेचा वापर विद्यार्थ्यांना बाह्य जगात करता येणे. मूल्यमापनात या उपयोजनाचाही समावेश शिक्षकाने केला पाहिजे.

विद्यार्थ्याला होणारी क्षमतेची प्राप्ती वैयक्तिक आहे; मात्र त्याने ती संपादन करण्याची प्रक्रिया सांघिक आहे. त्या स्वरूपाच्या अध्यापनातून गुणवत्तेमध्ये समानता येणे आणि अध्यापनात सांघिक भावना वाढणे असा दुहेरी फायदा होईल अशी अपेक्षा आहे.

## क्षमतांची यादी

| क्षेत्र | क्षमता क्र. | क्षमता |
|---|---|---|
| १. श्रवण | १.२.१ | सोपी पण अपरिचित गाणी, कविता आणि कथा समजपूर्वक ऐकता येणे. |
| | १.२.२ | परिचित प्रसंगातील संभाषण व संवाद समजपूर्वक ऐकता येणे. |
| | १.२.३ | परिचित प्रसंगात केलेली तोंडी विनंती, सूचना, आज्ञा आणि प्रश्न समजपूर्वक ऐकता येणे. |
| २. भाषण | २.२.१ | मातृभाषेतील (सर्व) ध्वनींचा (बाराखडीतील अक्षरांचे व जोडाक्षरांचे) योग्य उच्चार करता येणे. |
| | २.२.२ | समूहात आणि स्वतंत्रपणे कविता आणि गाणी म्हणता येणे. |
| | २.२.३ | सोप्या प्रश्नांची उत्तरे पूर्ण वाक्यात देता येणे. |
| | २.२.४ | परिचित वस्तू, प्रसंग/घटना यांविषयी प्रश्न विचारून माहिती मिळवता येणे. |
| ३. वाचन | ३.२.१ | वाचनात कमी वेळा येणारी अक्षरे व जोडाक्षरे वाचता येणे. |
| | ३.२.२ | मोठ्या आणि लहान टाईपमधील छापील मजकूर समजपूर्वक वाचता येणे. |
| | ३.२.३ | कविता, गाणी आणि लहान गोष्टी मोठ्याने समजपूर्वक वाचता येणे. |
| ४. लेखन | ४.२.१ | शब्द व वाक्ये पाहून लिहिता येणे. (अनुलेखन) |
| | ४.२.२ | परिचित शब्दांचे श्रुतलेखन करता येणे. |
| | ४.२.३ | सोपी, वर्णनात्मक वाक्ये स्वतःहून लिहिता येणे. |
| ५. आकलन (ऐकून व वाचून) | ५.२.१ | तोंडी सांगितलेल्या किंवा लिखित मजकुरातील घटनाक्रम पुन्हा सांगता येणे. |
| | ५.२.२ | मजकूर ऐकून किंवा वाचून का ? व कसे ? अशा प्रश्नांची उत्तरे देता येणे. |
| ६. कार्यात्मक व्याकरण | ६.२.१ | मूळशब्दाला उपसर्ग लावून आणि प्रत्यय जोडून शब्द तयार करता येणे. |
| ७. स्वयंअध्ययन | ७.२.१ | शब्द-चित्रपट्ट्या/शब्द-चित्रकोशाचा उपयोग करता येणे. |
| ८. भाषेचा व्यवहारात उपयोग | ८.२.१ | नम्रतापूर्वक बोलता येणे व इतरांचे बोलणे लक्षपूर्वक ऐकता येणे. |
| ९. शब्दसंपत्तीवर प्रभुत्व | ९.२.१ | सुमारे २००० शब्दांचे आकलन होणे. |

# अनुक्रमणिका

# १. झोपाळा गेला उडून



एका तळ्यात दोन बेडूक होते. एकदा त्यांना पाण्यात दोन खांब दिसले. त्यांनी एक वेल आणून खांबांना बांधला.



वेलाचा छानदार झोपाळा तयार झाला! दोघेही बेडूक त्यावर बसून झोके घेऊ लागले.

मुलांना चित्रांचे निरीक्षण करायला सांगावे. चित्रांवर आधारित प्रश्न विचारावेत. चित्रांसमोरील मजकूर वाचून कथा ऐकवावी. गोष्टीतील मजकूर सलग वाचायला सांगावा. त्यावर आधारित सोपे प्रश्न विचारावेत.

१.२.१, १.२.३, २.२.३, ३.२.३



तोच काय गंमत झाली, अचानक तो झोपाळा उडू लागला.



ते दोन खांब नसून एका बगळ्याचे पाय आहेत, हे लक्षात आल्यावर बेडकांनी पटकन पाण्यात उड्या घेतल्या.



# २. लोभी कुत्रा



एक कुत्रा रस्त्याने चालला होता.



त्याला रस्त्यावर एक भाकरीचा तुकडा सापडला.



भाकरीचा तुकडा तोंडात धरून तो धावू लागला.

मुलांना चित्रांचे निरीक्षण करायला सांगावे. चित्रांवर आधारित प्रश्न विचारावेत. चित्रांसमोरील मजकूर वाचून कथा ऐकवावी. गोष्टीतील मजकूर सलग वाचायला सांगावा. त्यावर आधारित सोपे प्रश्न विचारावेत. त्याआधारे कथेचे तात्पर्य विद्यार्थ्यांकडून काढून घ्यावे.

१.२.१, १.२.३, २.२.३, ३.२.३



कुत्रा एका पुलावर येऊन थांबला. पुलाखाली खूप पाणी साचलेले होते.

कुत्र्याने पाण्यात पाहिले. त्याला पाण्यात एक कुत्रा दिसला. त्याच्याही तोंडात भाकरीचा तुकडा होता. त्याला वाटले पाण्यातल्या कुत्र्याच्या तोंडातून आपण भाकरीचा तुकडा हिसकावून घ्यावा.





तो तोंड उघडून भुंकू लागला. तोच त्याच्या तोंडातून भाकरीचा तुकडा पाण्यात पडला.



# ३. कोणाचे ग कोणाचे ?



कोणाचे ग कोणाचे ?
सुंदर डोळे कोणाचे ?
त्या पाण्यातील माशाचे,
की माझ्या बाळाचे ?



कोणाचे ग कोणाचे ?
लाल गाल ग कोणाचे ?
झाडावरच्या गुलाबाचे,
की माझ्या बाळाचे ?

| कविता म्हणून दाखवावी. योग्य कृती व अभिनय करून मुलांकडून स्वतंत्रपणे आणि समूहात म्हणवून घ्यावी. |
| --- |
| १.२.१, १.२.३, २.२.२, २.२.३, ३.२.३ |



कोणाचे ग कोणाचे ?
गोड बोल ग कोणाचे ?
त्या गाणाऱ्या मैनेचे,
की माझ्या बाळाचे ?





कोणाचे ग कोणाचे ?
रूप गोजिरे कोणाचे ?
आकाशातील चंद्राचे,
की माझ्या बाळाचे ?

कवयित्री - आशा गवाणकर

# ४. माकडे आणि टोपीवाला



एक टोपीवाला डोक्यावर गाठोडे घेऊन टोप्या विकण्यासाठी निघाला होता.



तो चालून चालून दमला आणि एका आंब्याच्या झाडाखाली बसला. दमल्यामुळे तेथेच त्याला झोप लागली.

मुलांना चित्रांचे निरीक्षण करायला सांगावे. चित्रांवर आधारित प्रश्न विचारावेत. चित्रांसमोरील मजकूर वाचून कथा ऐकवावी. गोष्टीतील मजकूर सलग वाचायला सांगावा. त्यावर आधारित सोपे प्रश्न विचारावेत. त्याआधारे कथेचे तात्पर्य विद्यार्थ्यांकडून काढून घ्यावे.

१.२.१, १.२.३, २.२.३, ३.२.३



तितक्यात तेथे काही माकडे आली. त्यांनी गाठोडे सोडले. त्यातील टोप्या घेतल्या आणि झाडावर जाऊन बसली.



टोपीवाला उठला आणि बघतो तर गाठोड्यात टोप्याच नाहीत. टोपीवाला विचार करू लागला.



त्याला झाडावर माकडे दिसली. त्यांच्या डोक्यांवर टोप्या होत्या. टोपीवाल्याने माकडांना भीती दाखवली.

माकडांनीही टोपीवाल्याला भीती दाखवली. टोपीवाला घाबरला.





टोपीवाल्याने माकडांवर दगड फेकले.

माकडांनी झाडावरील कैऱ्या तोडून टोपीवाल्यावर फेकल्या.



टोपीवाल्याने युक्ती केली. त्याने आपल्या डोक्यावरील टोपी काढून जमिनीवर जोरात आपटली.





माकडांनीही आपल्या डोक्यांवरील टोप्या खाली फेकल्या. टोपीवाल्यास आपल्या टोप्या परत मिळाल्या.

# ५. आमची मंजू



ही आमची मंजू,
फार गुणी मुलगी.



ती सकाळी लवकर उठते.
दात घासते, तोंड धुते.



दूध पिते.

मुलांना चित्रांचे निरीक्षण करायला सांगावे. चित्रांवर आधारित सोपे प्रश्न विचारावेत. मजकुराच्या आधारे मंजूची दिनचर्या सांगावी. मजकूर सलग वाचायला सांगावा. त्यावर आधारित सोपे प्रश्न विचारावेत.

१.२.१, १.२.३, २.२.३, ३.२.३, ५.२.१, ५.२.२


नंतर आई तिची वेणी घालते.


अंघोळ झाली की स्वतः कपडे घालते.


मग ती अभ्यासाला बसते. मन लावून अभ्यास करते.


अभ्यास झाल्यावर पुस्तकाची आवरा-आवर करते.


जेवायला बसताना स्वत: ताट मांडते.
पेला भरून पाणी घेते.


आई तिला जेवायला वाढते. ती प्रत्येक
पदार्थ चाखून पाहाते.


प्रत्येक पदार्थ ती आवडीने खाते.


ताटात काही शिल्लक ठेवत नाही.


ेवण झाल्यावर ती आईला सांगून शाळेत
जाते.


शाळेत तिला खूप मैत्रिणी आहेत. मैत्रिणींशी गप्पा-
गोष्टी करायला तिला फार आवडते.


घंटा झाली की मंजू वर्गात जाते. अभ्यास
करते.


इतरही उपक्रमांत भाग घेते.



शाळेत बाईंची शाबासकी मिळवते.



खेळताना ती कोणाशी भांडत नाही, रुसत नाही.



घरी आल्यावर हात पाय धुते.



आईला कामात मदत करते.



आई-बाबांशी गप्पा मारते.



रात्री जेवण करून झोपण्यापूर्वी वाचन करते.



लेखिका - लीला मस्तकार-रेळे

# ६. भूर जाऊ



मज म्हणशी भूर जाऊ
आई कुठे सांग ते ।।धृ.।।



थवा पाखरांचा जातो
उडुनि काय तेथे ?

सडक घेत वळणे गेली
थेट काय तेथे ?



नदी जाय वाहत अपुली
काय त्या दिशेने ?

| कविता म्हणून दाखवावी. योग्य कृती व अभिनय करून मुलांकडून स्वतंत्रपणे आणि समूहात म्हणवून घ्यावी. |
|---|
| १.२.१, १.२.३, २.२.२, २.२.३, ३.२.३ |

शीट जात फुंकित का ही
आगगाडी तेथे ?





तेथे टपालाची गाडी
डाक काय नेते ?

म्हणती मुले, 'भरते यात्रा
फार जंगी तेथे !'



भूर गडे आपण जावे
मनी फार येते !

खूप मला मिळतिल मौजा
पाहण्यास तेथे !

कवी - ग. ह. पाटील

शीट - शिटी

## नमुना चाचणी पहिली

- **'झोपाळा गेला उडून', 'लोभी कुत्रा', 'माकडे आणि टोपीवाला' यांपैकी कोणतीही एक गोष्ट विद्यार्थ्याला ऐकवावी. नंतर सोपे प्रश्न विचारावेत.** (१.२.१, २.२.३)
  **जसे** — कुत्र्याला भाकरीचा तुकडा कोठे सापडला ?

- **सांगा.** (५.२.२)
  (१) बेडकांनी पाण्यात उड्या का घेतल्या ?
  (२) कुत्र्याच्या तोंडातील भाकरीचा तुकडा पाण्यात का पडला ?
  (३) माकडांनी झाडावरील कैऱ्या का फेकल्या ?

- **वाचा.** (३.२.१, ३.२.२)
  एका तळ्यात दोन बेडूक होते. त्यांना पाण्यात दोन खांब दिसले. बेडकांनी खांबाला वेल बांधला. छानदार झोपाळा तयार झाला. बेडूक झोपाळ्यावर झोके घेऊ लागले. इतक्यात झोपाळा उडू लागला. बेडकांनी पाण्यात उड्या घेतल्या.

- **ऐका. पाटीवर लिहा.** (४.२.२)
  गंमत, सुंदर, गोजिरे, गाठोडे, भीती, माझ्या, चंद्र, कैऱ्या, युक्ती, टोप्या, थवा, सडक, शीट, डाक, तार, यात्रा, मौजा

- **'माकडे आणि टोपीवाला' ही गोष्ट सांगा.** (५.२.१)

- **प्रश्न विचारा.** (२.२.४)
  **जसे** — टोपीवाला बाजारात निघाला होता. — टोपीवाला कोठे निघाला होता ?
  बाजारात कोण निघाला होता ?

  टोपीवाला झाडाखाली झोपला. — ..............................

  माकडांनी झाडावरील कैऱ्या फेकल्या. — ..............................

  टोपीवाल्याला टोप्या परत मिळाल्या. — ..............................

- **'कोणाचे ग कोणाचे ?' व 'भूर जाऊ' या गाण्यांतील एक एक कडवे म्हणून दाखवा.** (२.२.२)

- **जोड्या लावा.** (७.२.१)

सुंदर लाल गोड गोजिरे

रूप डोळे गाल बोल

- **तुम्ही काय करता ते लिहा.** (४.२.३)

**जसे** – ही मंजू आहे. मी .................. आहे.
(स्वत:चे नाव लिहा.)

मंजू दुसरीत आहे. मी ..............................

मंजू सकाळी लवकर उठते. मी सकाळी ..............................

मंजू रोज अभ्यास करते. मीसुद्धा ..............................

..............................

..............................

मंजू न चुकता शाळेत जाते.

..............................

..............................

मंजू चित्रे छान काढते.

..............................

..............................

मंजूला गाणी, खेळ आवडतात.

..............................

..............................

मंजू आईबाबांच्या कामात मदत करते.

..............................

- **खालील शब्दांच्या मागे 'सु' लावून नवीन शब्द तयार करा. लिहा.** (६.२.१)

**जसे** – प्रसिद्ध – सुप्रसिद्ध

कन्या .................. विचार ..................

पुत्र .................. गंध ..................

वार्ता .................. शिक्षित ..................

# ७. उठा उठा चिऊताई



उठा उठा चिऊताई
सारीकडे उजाडले
डोळे तरी मिटलेले
अजूनही !

सोनेरी किरण आले
घरट्याच्या दारापाशी
डोळ्यांवर झोप कशी
अजूनही !



लगबग पाखरे ही
गात गात गोड गाणे
टिपतात बघा दाणे
चोहीकडे !

| कविता म्हणून दाखवावी. योग्य कृती व अभिनय करून मुलांकडून स्वतंत्रपणे आणि समूहात म्हणवून घ्यावी. |
| --- |
| १.२.१, १.२.३, २.२.२, २.२.३, ३.२.३, ४.२.१, ५.२.१, ५.२.२, ६.२.१, ९.२.१ |

झोपलेल्या अशा तुम्ही
आणायचे मग कोणी
बाळासाठी चारा पाणी
चिमुकल्या ?



बाळाचे नि घेता नाव
जागी झाली चिऊताई
उठोनिया दूर जाई
भूर भूर

कवी - कुसुमाग्रज

सोनेरी - सोन्यासारखे पिवळे
लगबग - घाईने
चिमुकला - लहान

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.** (२.२.३, ५.२.२)

(१) गोड गाणी कोण गातात ?

..........................................................................

(२) उजाडले तरी चिऊताई काय करत होती ?

..........................................................................

(३) कोणाचे नाव घेताच चिऊताई जागी झाली ?

..........................................................................

(४) चिऊताई भूर भूर कशासाठी जाते ?

..........

**खालील शब्दांना 'साठी' हा प्रत्यय जोडून लिहा.** (६.२.१)

जसे – बाळ  बाळासाठी

घर ..........  गाव ..........

राज्य ..........  देश ..........

शब्दांच्या मागे उपसर्ग आणि शब्दांच्या पुढे प्रत्यय जोडले जातात. (६.२.१)

**उलट अर्थाचे शब्द माहीत करून घ्या. लिहा.** (९.२.१)

लगबग × ..........  झोपलेली × ..........

दूर × ..........  जाणे × ..........

**कसे ते लिहा.** (५.२.१)

.......... डोळे .......... किरण .......... गाणे

**जोड्या जुळवा.** (५.२.१)

| | |
|---|---|
| चिमणी | बीळ |
| घोडा | घरटे |
| कोंबडी | तबेला |
| उंदीर | वारूळ |
| मुंग्या | खुराडे |

**हे शब्द असेच लिहा.** (४.२.१)

अजून  किरण  दूर

..........

..........

# ८. असा पडतो पाऊस

सदू खेळायला निघाला. इतक्यात जोराचा वारा आला. आभाळ भरून आले. सूर्य दिसेनासा झाला. विजा चमकू लागल्या. ढगांचा गडगडाट झाला. जोरदार पाऊस पडू लागला. सदू ओलाचिंब झाला. तो एका घराच्या आडोशाला उभा राहिला.

'अरे बापरे ! केवढा हा पाऊस !' सदू म्हणाला. हे पावसाने ऐकले. त्याला वाटले, सदूशी बोलावे.



१.२.१, १.२.२, २.२.३, ३.२.१, ३.२.२, ३.२.३, ४.२.१, ५.२.१, ५.२.२, ६.२.१

इतक्यात 'सदू' अशी हाक आली. कोणी हाक मारली, म्हणून सदू इकडे तिकडे पाहू लागला.

पाऊस – अरे, इकडे बघ. मी पाऊस बोलतोय.

सदू – कोण ? पाऊस ! तू बोलतोस ? अरे, पण तू असा अचानक कुठून आलास ? कसा आलास ?

पाऊस – अरे, मी आभाळातून आलो.

सदू – पण तू वर आभाळात गेलास कसा ?

पाऊस – मी आधी होतो पाणी. नदीत, समुद्रात खेळत होतो. उन्हाळा आला आणि कडक ऊन



पडले. मला चटके बसू लागले. माझे अंग गरम झाले. मी हलका झालो. वाफ होऊन आपोआप वर जाऊ लागलो.

सदू – लपून छपून गेलास वाटते ?

पाऊस – नाही रे ! वाफेच्या रूपात वर जाताना मी तुम्हांला दिसत नाही. आभाळात जाता जाता आमचे ढगात रूपांतर होते. आम्ही ढग झालो, की तुम्हांला दिसतो. तेथे वारा आम्हांला आणखी उंच उंच आभाळात ढकलतो.



सदू – बरं, मग, पुढं काय होतं रे ?

पाऊस – तेथे आम्हांला थंड हवा लागते. आमचे अंग जड होते. आभाळात राहवत नाही. आम्ही झरझर खाली येतो. त्याला तुम्ही पाऊस म्हणता.

सदू – गंमतच आहे तुझी ! ढगातून खाली येताना पाऊस असतोस. जमिनीवर वाहताना पाणी असतोस. आभाळात जाताना वाफ होतोस. आभाळात गेल्यावर तू ढग होतोस.

पाऊस – वेगवेगळ्या रूपांत वावरताना मला फार मजा वाटते. मी सगळ्यांना पाणी देतो. माझ्यामुळे नद्या, नाले भरून वाहतात. पिके येतात; म्हणून लोकांना मी हवाहवासा वाटतो. सर्वजण माझी आतुरतेने वाट पाहतात.

......पावसाची झिमझिम कमी होऊ लागली.

सदू – मीपण वाट पाहीन. उद्या पुन्हा ये बरं का !

ओलाचिंब होणे - पूर्ण भिजणे

## स्वाध्याय

- पूर्ण वाक्यात उत्तरे सांगा. (२.२.३, ५.२.२)
  - (१) सदू ओलाचिंब का झाला ?
  - (२) पाऊस आभाळात कोणते रूप घेऊन गेला ?
  - (३) लोक पावसाची वाट का पाहतात ?
- कोण कोणास म्हणाले ते सांगा. (५.२.१)
  - (१) लपून छपून गेलास वाटते ?

(२) सर्वजण माझी आतुरतेने वाट पाहतात.

- **कंसातील योग्य शब्द निवडून खालील वाक्यांतील रिकाम्या जागी लिहा.** (५.२.१)

(पाऊस, वर, थंड, वाफ, ढग, वारा)

उन्हामुळे समुद्राच्या पाण्याची .............. होते. वाफ हलकी असल्यामुळे आपोआप .......... जाऊ लागते. वाफेचे .............. होतात. ढगांना .............. वर वर उंच आभाळात ढकलतो. ढग .............. हवेमुळे झरझर खाली येतात. त्याला आपण .............. म्हणतो.

- **पावसाळ्यात तुम्हांला घराच्या, शाळेच्या अवतीभोवती काय काय बदल दिसतात ?**

- **'रूप' या शब्दाला 'वान' प्रत्यय लावून 'रूपवान' शब्द तयार होतो. खालील शब्दांना 'वान' प्रत्यय लावून शब्द तयार करा. लिहा.** (६.२.१)

धन – ..............        गुण – ..............

बल – ..............        शील – ..............

- **खाली काही शब्दार्थ दिले आहेत. त्या अर्थाचे धड्यातील शब्द शोधा.** (५.२.१)

गरम लागणे, पूर्ण भिजणे, आवडणे

- **हे शब्द असेच लिहा.** (४.२.१)

तू        मी        पाऊस        किती

..............................................................................

# ९. माझे घर



पलीकडे ओढ्यावर
माझे गाव ते सुंदर,
झाडाझुडुपात आहे
लपलेले माझे घर.

माझ्या गावातून जाते
चिमुकली हीच वाट,
मला ओढुनीया नेते
माझ्या घराशी ही थेट.



पिंपळाच्या झाडापाशी
लहानसे माझे घर,
तुळशीचे वृंदावन
चिरेबंदी ओट्यावर.

माझी आई तेथे दारी
माझ्या भावंडांचा मेळा,
घरी गेल्यावर होतो
माझ्या भोवताली गोळा.

कविता म्हणून दाखवावी. योग्य कृती व अभिनय करून मुलांकडून स्वतंत्रपणे आणि समूहात म्हणवून घ्यावी.

१.२.१, १.२.३, २.२.२, २.२.३, ३.२.३, ४.२.१, ४.२.३, ५.२.१, ६.२.१

कमा येते, चंदू येतो
    'भाऊ आला' म्हणत,
मिठी मग सोडवीतो
    हातावर खाऊ देत.

कवी - गणेश कुडे

**चिरेबंदी** - घडवलेल्या दगडांचे भक्कम बांधकाम
**झुडूप** - लहान झाड          **थेट** - सरळ

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे सांगा.** (२.२.३, ५.२.१)
  (१) कवीचे गाव कोठे आहे ?
  (२) कवीचे घर कशात लपले आहे ?
  (३) कवीचे घर कोणत्या झाडापाशी आहे ?
  (४) घरी गेल्यावर कवीभोवती कोण-कोण गोळा होतात ?

- **खाली शब्दांची जोडी दिली आहे. ती वाचा. त्याप्रमाणे दिलेल्या शब्दाच्या जोडीचा शब्द लिहा.** (६.२.१)

**जसे** — घर - घराशी
  दार - ..................   पिंपळ - ..................

**जसे** — हात - हातावर
  बाक - ..................   झाड - ..................
  पाय - ..................

जसे — ओटा - ओट्यावर

ओढा - .................... फळा- ....................

- लहानशी वाट कवीला अगदी घरापाशी ओढून नेते, या अर्थाच्या कवितेतील ओळी सांगा. (५.२.१)
- तुमच्या घराजवळ खालीलपैकी ज्या गोष्टी आहेत त्यापुढे ☑ अशी खूण करा आणि पाटीवर लिहा. (४.२.१)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ओढा | ☐ | नदी | ☐ | धरण | ☐ |
| समुद्र | ☐ | झाड | ☐ | बाग | ☐ |
| शाळा | ☐ | दवाखाना | ☐ | रेल्वे स्टेशन | ☐ |
| दूधकेंद्र | ☐ | कचरापेटी | ☐ | जाहिरात | ☐ |
| पायवाट | ☐ | रिक्षातळ | ☐ | गटार | ☐ |
| विहीर | ☐ | पत्रपेटी | ☐ | डांबरी रस्ता | ☐ |
| छोटासा रस्ता | ☐ | तुळशीचे वृंदावन | ☐ | | |
| भाजीमंडई | ☐ | खेळाचे मैदान | ☐ | | |
| बसस्थानक | ☐ | | | | |

- वरीलपैकी तुमच्या आवडीच्या एका ठिकाणाचे वर्णन करा. (४.२.३)
- हे शब्द असेच लिहा. (४.२.१)

ही खाऊ तुळस मिठी

..........................................................................

# १०. ये रे ये रे कोल्होबा

एक होती आजीबाई.
तिची होती एक झोपडी.
झोपडीभोवती होती झाडी.
आजीच्या झोपडीमागे बोरीचे एक झाड होते.
झाड बोरांनी भरून जाई.
रात्री खूप बोरे झाडाखाली पडत.
बोरे पाहून आजीला आनंद होई.
आजी बोरे जमवून बाजारात विकायला नेई.
तिला पैसे मिळत.



१.२.१, १.२.२, २.२.१, २.२.३, ३.२.३, ४.२.१,५.२.१, ५.२.२, ६.२.१, ९.२.१

पुढे काही दिवसानंतर रात्रीच्या वेळी एक कोल्हा यायचा.

गुपचूप बोरे खाऊन जायचा.

सकाळी आजी पाहायची, झाडाखाली बोरे नसायची.



तिला आश्चर्य वाटायचे –

'कोण बरं येतं ? कोण बोरं खाऊन जातं ?

बोरांची राखण केलीच पाहिजे.

रात्री गुपचूप बसून पाहिलंच पाहिजे.

बोरांवर नीट लक्ष ठेवलंच पाहिजे.' असा तिने विचार केला.

त्या रात्री आजी जागी राहिली.

तिने कोल्ह्याची करामत पाहिली. ती मनात म्हणाली,

'अरे कोल्होबा, सोकावलास काय ? गुपचूप येऊन बोरं खातोस काय ? थांब, आता तुझी खोडच मोडते. पुन्हा कसा येतोस तेच मी पाहते !' दुसऱ्या रात्री आजीने गंमत केली. झोपडीत गुपचूप लपून बसली. सोकावलेला कोल्होबा हळूच आला. बोरे खाण्यात दंग झाला. अरे बापरे, तेवढ्यात काय झाले !



आजीबाईच्या झोपडीतून खूप दगड आले.
कोल्होबाचे अंग शेकून निघाले.
कोल्होबाचे डोके सडकून निघाले.
कोल्होबाला खूप मार बसला.
तो भिऊन पळून जाऊ लागला.



आजी खोखो हसत म्हणाली, ‘‘ये रे ये रे कोल्होबा, बोरं पिकली !’’ कोल्होबा रडत रडत म्हणाला, ‘‘नको नको आजीबाई, माझी खोड मोडली !’’

लेखक - शं. रा. देवळे

सोकावणे - गोडी लागणे, सवय लागणे

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे सांगा.** (२.२.३, ५.२.२)
  - (१) कोल्हा बोरे खायला केव्हा यायचा ?
  - (२) कोल्ह्याची खोड आजीबाईने कशी मोडली ?
- **खालील वाक्ये बरोबर करून लिहा.** (५.२.१)
  - (१) आजीबाई बंगल्यात राहत होती.

    ......................................................

  - (२) आजीबाईच्या अंगणात आंब्याचे झाड होते.

    ......................................................

(३) बोरे खाण्यात वाघोबा दंग झाले.

..........................................................................

(४) आजीबाईच्या झोपडीतून बंदुकीच्या गोळ्या आल्या.

..........................................................................

- **कोण म्हणाले ते सांगा.** (५.२.१)

(१) अरे कोल्होबा, सोकावलास काय ?

(२) "ये रे ये रे कोल्होबा, बोरं पिकली !"

(३) "नको नको आजीबाई, माझी खोड मोडली !"

- **उलट अर्थाचे शब्द माहीत करून घ्या. लिहा.** (९.२.१)

गोड × ..................  हळू × ..................

झोपडी × ..................  आनंद × ..................

हसणे × ..................  चांगली × ..................

- **खालील शब्दांपुढे 'बा' जोडून लिहा.** (६.२.१)

**जसे** – कोल्हा - कोल्होबा, नाग - नागोबा

बोका – ..................  वाघ – ..................

वेडा – ..................  लाड – ..................

- **हे शब्द असेच लिहा.** (४.२.१)

तिला  तिची  तिने  खूप  आश्चर्य  गुपचूप

..........................................................................

..........................................................................

# ११. नदीचे गाणे

दरीदरीतुन, वनावनांतुन
झुळझुळ मी वाहत येते
मी मंजूळ गाणे गाते
मी पुढेच धावत जाते...

बसली गावे तीरावरती
त्यांना भेटुनि जाते पुढती
लतावृक्ष किती काठावरती,
भूमितुनी जे मला भेटती



१.२.१, २.२.२, २.२.३, ३.२.१, ३.२.२, ४.२.१, ५.२.१, ५.२.२, ९.२.१

फुलवेली मज सुमने देती,
कुठे लव्हाळी खेळत बसती
कुठे आम्रतरू माझ्यावरती
शीतल अपुली छाया धरती



पाणी पिउनी पक्षी जाती
घट भरुनी कोणी जल नेती
गुरे-वासरे जवळी येती
मुले खेळती लाटांवरती



मी कोणाची - मी सर्वांची,
बांधुनिही मज नेणाऱ्यांची !
जेथे जाईन - तेथे फुलवीन
बाग मनोहर आनंदाची !



कवी - वि. म. कुलकर्णी

**मंजूळ** - ऐकायला गोड **तीर** - काठ **लता** - वेल
**वृक्ष** - झाड **सुमन** - फूल
**लव्हाळी** - पाण्यात वाढणारी एक वनस्पती
**आम्रतरू** - आंब्याचे झाड **शीतल** - थंड
**छाया** - सावली **घट** - मातीचा घडा (माठ)

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे सांगा.** (२.२.३, ५.२.२)

(१) मंजूळ गाणे कोण गाते ? (२) गावे कोठे बसली आहेत ?
(३) नदीवर शीतल छाया कोण धरते ? (४) नदी जेथे जाईल तेथे काय करील ?

- **मोकळ्या जागी योग्य शब्द लिहा.** (४.२.१)

फुलवेली मज .................. देती.
कुठे .................. खेळत बसती.
कुठे .................. माझ्यावरती.
.................. अपुली छाया धरती.

- **कवितेतील समानार्थी शब्द शोधा. पाटीवर लिहा.** (४.२.१)

**जसे –** तरू – वृक्ष
जल, सुमन, काठ

- **जोड्या जुळवा.** (५.२.१)

झुळझुळ मंजूळ शीतल
..............................................................
गाणे छाया पाणी

- **हे शब्द असेच लिहा.** (४.२.१)

मंजूळ शीतल तीर
..............................................................

## नमुना चाचणी दुसरी

- एका वाक्यात उत्तरे द्या. (५.२.२)
  (१) उजाडले तरी कोणाचे डोळे मिटलेले होते ?
  (२) उजाडले त्यावेळी पाखरे काय करत होती ?
  (३) जाग येताच चिऊताई काय करते ?
  (४) आजीबाईला कशाचे आश्चर्य वाटले ?
  (५) नदीवर गार सावली कोण धरतात ?
  (६) नदी कोणासाठी वाहत असते ?

- कोण म्हणाले ? (२.२.३)
  (१) "अरे, मी आभाळातून आलो !"
  (२) "लपून छपून गेलास वाटते ?"
  (३) "थांब, आता तुझी खोडच मोडते."
  (४) "नको नको आजीबाई, माझी खोड मोडली !"
  (५) "मी मंजूळ गाणे गाते - मी पुढेच धावत जाते."

- समानार्थी एकेक शब्द सांगा. (९.२.१)
  पाखरे, आभाळ, आश्चर्य, डोके, सुमन, वन, घर, जल, तरू, भूमी

- उलट अर्थाचे एकेक शब्द सांगा. (९.२.१)
  गोड, चिमुकला, खाली, दूर, शीतल

- लिहा. (४.२.१)
  सूर्य, समुद्र, गर्दी, वृंदावन, सर्व, वृक्ष, आश्चर्य, आम्रतरू, कोल्हा, लव्हाळी

  ..........................................................................

  ..........................................................................

- वाचा. (३.२.२, ३.२.३)
  झाडे आपले मित्र आहेत.
  झाडे आपल्याला फुले देतात, फळे देतात.




गार गार सावली देतात.

आपण सर्व झाडांची काळजी घेऊया.

- **जोड्या जुळवा.**

शिक्षकांनी कल्पफलकावर शब्दांचे काही कार्ड्स लावावेत. काही शब्दकार्ड्स टेबलावर ठेवावेत. एकेका विद्यार्थ्याला टेबलावरील एकेक शब्दकार्ड घेऊन फलकावरील योग्य शब्दापुढे लावण्यास सांगावे. (७.२.१)

| नमुना शब्द (फलकावरील) | नमुना शब्दकार्ड (टेबलावरील) |
|---|---|
| सोनेरी | ओटा |
| थंड | बाग |
| चिरेबंदी | छाया |
| मंजूळ | किरण |
| शीतल | गाणे |
| मनोहर | हवा |

- **कवितेच्या ओळी पूर्ण करा. लिहा.** (४.२.३)

मी कोणाची ..............................

बांधुनिही मज ..............................

जेथे जाईन ..............................

बाग मनोहर ..............................

- **खालील शब्दांच्या मागे 'गैर' जोडून नवीन शब्द तयार करा. लिहा.** (६.२.१)

**जसे** – व्यवहार – गैरव्यवहार

हजर .................... प्रकार ....................

वर्तन .................... सोय ....................






# १२. देतो तो देव

गागोदे नावाचे एक लहानसे गाव होते. गावात मोजकी घरे होती. त्यांतील एक घर विनूचे होते. घरामागील परसामध्ये आंब्याची, फणसाची झाडे होती.

उन्हाळ्यात त्या झाडांना फळे लागली. हळूहळू झाडे फळांनी भरून गेली. झाडांवरील आंबे, फणस पाहून ते खाण्यासाठी विनूने एकदा आईजवळ हट्ट धरला. विनूची आई म्हणाली, "अरे, किती घाई करतोस ? फळे मोठी होऊ देत; पिकू देत. मग काढीन, तुला खायला देईन."



१.२.२, १.२.३, २.२.१, २.२.३, २.२.४, ३.२.१, ४.२.१, ५.२.२, ६.२.१, ९.२.१



एके दिवशी आईने पिकलेला एक फणस काढून घेतला. तो कापला. त्यांतील रसाळ गरे काढले. वेगवेगळ्या द्रोणांमध्ये भरून ठेवले.

विनू पाहतच होता. रसाळ गऱ्यांचा पहिला द्रोण आपल्यालाच मिळणार याची त्याला खात्री होती.

आईने त्यांतील एक द्रोण विनूच्या हातात देऊन शेजारच्यांकडे पोचवण्यास सांगितले.

आईने सांगितल्याप्रमाणे विनूने हातातील द्रोण शेजारच्यांकडे पोचवला व तो घरी आला.

आता आपल्याला रसाळ गरे नक्कीच खायला मिळणार, असे विनूला वाटले.

आईने पुन्हा एक द्रोण विनूच्या हातांत ठेवून, तो गावकऱ्यांकडे नेऊन देण्यास सांगितले.



असे करत करत द्रोण घरोघर पोचवून झाले, तरी आपल्याला गरे देण्याची आई गोष्टच काढत नाही, याचे विनूला नवल वाटले, वाईटही वाटले.

आईच्या हे लक्षात आले. ती हसली. तिने विनूला जवळ बोलावले आणि अतिशय प्रेमाने गऱ्यांचा द्रोण त्याच्या हाती दिला.

तरी विनूची नाराजी गेली नाही. आपल्याच घरचे फळ नि आपल्याला मात्र सगळ्यात शेवटी. याबद्दलचा त्याचा रुसवा कायम होता. आईने असे का करावे ते विनूला समजेना. न राहवून त्याने आईला विचारले, ''गावाला अगोदर आणि मुलाला शेवटी, असं का ?''

आई पुन्हा हसली आणि म्हणाली, ‘‘अरे, आपल्याजवळ जे असतं ना ते अगोदर इतरांना द्यावं आणि मग आपण घ्यावं. इतरांना विसरून आपण एकट्यानेच घेणं हे बरोबर नाही. लक्षात ठेव, देतो तो देव आणि राखतो तो राक्षस.’’

‘‘म्हणजे काय ?’’

‘‘देणे हा देवाचा उत्तम गुण आहे आणि फक्त स्वत:साठीच राखून ठेवणे, हा राक्षसांचा दुर्गुण आहे. आता तूच ठरव, तुला देव व्हायचं आहे, की राक्षस ?’’

विनूची समजूत पटली. त्याने आनंदाने गरे खायला सुरुवात केली.

हा विनू म्हणजेच महात्मा गांधींचे आवडते शिष्य विनोबाजी भावे होत.



**परस** - घराभोवतीची मोकळी जागा

## स्वाध्याय

- **एका वाक्यात उत्तरे सांगा. लिहा.** (२.२.३, ५.२.२)

(१) विनूला कशाचे नवल वाटले ?

..........

(२) विनूचे मोठेपणीचे नाव काय ?

..........

- **रिकाम्या जागी पाठातील योग्य शब्द भरा.** (४.२.१)

(१) "गावाला .......... आणि मुलाला .......... असं का ?"

(२) "लक्षात ठेव, देतो तो .......... आणि राखतो तो .........."

(३) "देणे हा देवाचा उत्तम .......... आहे आणि फक्त स्वत:साठी राखून ठेवणे हा राक्षसांचा .......... आहे."

(४) हा विनू म्हणजेच ..........चे आवडते शिष्य .......... होत.

- **उलट अर्थाच्या शब्दांच्या जोड्या लावा.** (९.२.१)

| | |
|---|---|
| लहान | घेणे |
| वाईट | राक्षस |
| अगोदर | शेवटी |
| सद्‌गुण | चांगले |
| देव | मोठे |
| देणे | दुर्गुण |

- **खालील शब्दांना 'ई' प्रत्यय जोडून लिहा.** (६.२.१)

**जसे —** ज्ञान – ज्ञानी

गुण – .................... नाराज – ....................

आनंद – .................... गोड – ....................

सुख – ....................

- **समानार्थी शब्द सांगा. लिहा.** (९.२.१)

नवल – ....................................................

उत्तम – ....................................................

सर्व – ....................................................

अगोदर – ....................................................

- **खालील शब्दांपासून नवीन शब्द तयार करा. लिहा.** (९.२.१)

**जसे —** घर - घरोघरी

गाव – ....................

देश – ....................

पद – ....................

दार – ....................

- **हे शब्द असेच लिहा.** (४.२.१)

हट्ट खात्री नक्की उत्तम पहिला गुण

..............................................................................





# १३. लपंडाव

कळीमध्ये लपते फूल;







फुलामध्ये लपते बी;



बियांमध्ये लपते झाड;



नारळामध्ये लपतो माड.





दर्यामध्ये लपतो ढग;

ढगामध्ये लपते नदी;





नदीमध्ये लपते पाणी;
गळ्यामध्ये लपतात गाणी.
या खेळाचे सांगा नाव
'लपंडाव ! लपंडाव !'

कवी - विंदा करंदीकर

१.२.१, २.२.२, २.२.३, ३.२.१, ३.२.३, ४.२.१, ४.२.३, ५.२.१, ५.२.२, ९.२.१

माड - नारळाचे झाड        दर्या - समुद्र, सागर

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे सांगा.** (२.२.३, ५.२.२)
  (१) नारळामध्ये कोण लपलेला असतो ?
  (२) कवीने लपाछपीच्या खेळाला कोणते नाव दिले आहे ?

- **तुम्हांला असलेल्या माहितीवरून आणखी कोण कोणांत लपलेले असते ते सांगा.** (२.२.३)

- **रिकाम्या जागी कंसातील योग्य शब्द लिहा.** (५.२.२)
  (बी, गाणी, नदी, ढग, माड, फूल, पाणी)

  नारळामध्ये लपतो ..........        ढगामध्ये लपते ..........
  फुलामध्ये लपते ..........        कळीमध्ये लपते ..........
  दर्यामध्ये लपतो ..........        नदीमध्ये लपते ..........
  गळ्यामध्ये लपतात ..........

- **योग्य क्रम लावून पुन्हा लिहा.** (४.२.१)
  झाड    फूल    कळी
  ..........    ..........    ..........

- **तुम्हांला आवडणाऱ्या झाडाचे चित्र काढा व ते रंगवा.**

# १४. घरचे डॉक्टर

आबा घराभोवतीच्या बागेत काम करत होते. बागेत तुळस, दूर्वा, सब्जा, गवती चहा, आले, अडुळसा होते, तर दारात बेलाचे मोठे झाड होते. फुलझाडांपेक्षा उपयोगी अशा झाडांचीच गर्दी झाली होती. एकदा रायबांनी विचारले, ''आबा, ही कसली वेगळीच झाडं लावलीत तुम्ही ?''

आबा म्हणाले, ''अरे, हे तर आपले घरचे वैद्य (डॉक्टर) आहेत.''



१.२.२, १.२.३, २.२.३, २.२.४, ३.२.१, ३.२.२, ४.२.१, ४.२.३, ५.२.२, ६.२.१, ९.२.१

रायबा - काहीतरी काय बोलताय ? हे कसले डॉक्टर ?

आबा - रायबा, साधे साधे आजार होतात आपल्याला ! कधी सर्दी होते, खोकला येतो, पोटात दुखतं....

रायबा - आता माणूस म्हणजे असं व्हायचंच.

आबा - म्हणून तर इथे उपयोगी पडतो हा घरचा डॉक्टर !

रायबा - माझ्या तर काही लक्षात येईना.

आबा - रायबा, आपण तुळस दारापुढे लावतो. सब्जा लावतो; कारण तुळशीतील माती औषधी असते. झाडं हवा स्वच्छ ठेवतात. पाने औषध म्हणून उपयोगी पडतात.

रायबा - खरंच की हो ! आणि दूर्वा...

आबा - पोटात दुखू लागले की मांजर दूर्वा खाते. कारण दुर्वांचा रस हा त्यावरचा उपाय. अनेक दुखण्यांवर ही वनस्पतींची औषधे उपयोगी असतात. पुन्हा किती सहज मिळतात ती ! परसात, डब्यात, कुंडीत अशा वनस्पती आपण लावू शकतो.

रायबा - आबा, तुम्हांला सांगतो. मला तर खोकला सारखा येतो. आता वयामुळं असं व्हायचंच...

आबा - म्हणून तर हा अडुळसा. पान फार कडू; पण रस काढला नि साखर किंवा गूळ घालून प्यायला, की खोकला गेलाच समजा !

रायबा - मला तर वाटतं, झाडासारखा मित्र नाही. झाडं सावली देतात, फुलं-फळं देतात, औषधं देतात.

आबा -- अशा शेकडो गुणकारी वनस्पती, आपल्याकडे आहेत. आपल्याभोवती जणू हे शेकडो मुके डॉक्टरच आहेत. आपल्या घरचे हे मुके डॉक्टर किती परोपकारी आहेत ! हे पटते का रायबा ?

रायबा - खरंच आबा, पटलं. मीही आता घरच्या परसात औषधी झाडं लावतो. मला रोपं द्या.

**सब्जा** - एक तुळशीसारखे रोप
**गुणकारी** - गुण देणारे
**परोपकारी** - दुसऱ्याच्या उपयोगी पडणारे
('ऑ' हा स्वर इंग्रजी भाषेतून आला आहे. त्याचा उच्चार कसा करायचा हे समजावून सांगावे. त्याचवेळी 'ॲ' या स्वराबद्दलही माहिती द्यावी.)

## स्वाध्याय

❑ **पूर्ण वाक्यात उत्तरे सांगा.** (२.२.३, ५.२.२)

(१) आबा बागेत काय करत होते ?

(२) झाडांचे आपल्याला कोणकोणते उपयोग होतात ?

(३) मुके डॉक्टर असे कोणाला म्हटले आहे ?

- **उलट अर्थाचे शब्द माहीत करून घ्या. लिहा.** (९.२.१)

उपाय × ..................  दाट × ..................

मित्र × ..................  मुके × ..................

- **नावे लिहा.** (४.२.३)

(१) पाच औषधी वनस्पती –

..................................................

(२) पाच फळझाडे –

..................................................

(३) पाच फुलझाडे –

..................................................

- **तुमच्या शाळेच्या आवारात कोणती झाडे असावीत असे तुम्हांला वाटते. नावे लिहा.** (४.२.३)

..................................................

- **'घर' शब्दाच्या पुढे 'त' प्रत्यय लावल्यास 'घरात' शब्द तयार होतो. याप्रमाणे खाली दिलेल्या शब्दांच्या पुढे 'त' जोडून नवीन शब्द तयार करा.** (६.२.१)

दार, पोट, हात, परस

- **हे शब्द असेच लिहा.** (४.२.१)

गर्दी दूर्वा सर्दी स्वच्छ मित्र तुम्ही

..................................................

## १५. पतंग

पतंग उडवू चला
गड्यांनो, पतंग उडवू चला.

रंग ढगांवर मावळतीचा
लाल पिवळसर किती मजेचा
झुळझुळ वारा नदीकाठचा
बाजुस डोंगरमळा.

करू चला सुरुवात बरोबर
सोडा सोडा रीळ भराभर
पतंग चढवा हे वाऱ्यावर
ढगांसु भेटायला.



१.२.२, २.२.१, २.२.२, २.२.३, ४.२.१, ५.२.२, ६.२.१, ९.२.१

मऊमऊ वाळुत पाय रोवुनी
देऊ झटका दोरा ओढुनी
पतंग जातिल वर वर चढुनी
पंख नको त्याजला.

जशी पाखरे आभाळात
पंख पसरुनी तरंगतात
दिसतिल तैसे पतंग रंगीत
खेळ किती चांगला !

कवी - अ. ज्ञा. पुराणिक

त्याजला - त्याला आभाळ - आकाश
तरंगणे - हवेत उडणे

## स्वाध्याय

- एका वाक्यात उत्तरे सांगा. लिहा. (२.२.३, ५.२.२)
  (१) सूर्य मावळण्याच्या वेळेस ढगांवर कोणता रंग दिसतो ?
  
  (२) पतंग कोणासारखे तरंगतात ?

- उलट अर्थाचे शब्द माहीत करून घ्या. लिहा. (९.२.१)

चढणे × ..................  मऊ × ..................

ओढणे × ..................  बरोबर × ..................

मावळणे × ..................  भराभर × ..................

- खालील शब्दांना 'सर' शब्द जोडून नवीन शब्द तयार करा व लिहा. (६.२.१)

जसे – पिवळा – पिवळसर  काळा – ..................

निळा – ..................  लाल – ..................

- मोकळ्या जागी कवितेतील योग्य शब्द लिहा. (४.२.१)

जशी .................. आभाळात

.................. पसरुनी तरंगतात

दिसतिल तैसे .................. रंगीत

खेळ किती .................. !

- तुम्हांला आवडणाऱ्या पाच खेळांची नावे सांगा.

- समानार्थी शब्द माहीत करून घ्या. लिहा. (९.२.१)

ढग – ..................  वारा – ..................

पाखरे – ..................

- हे शब्द असेच लिहा. (४.२.१)

झुळझुळ  रीळ  पिवळसर  पतंग

..................................................................................

# १६. सहल

आम्ही सहलीला निघालो. मला फार आनंद झाला. गुरुजी आमच्याबरोबर होतेच. आम्ही सारेजण एका डोंगरावर येऊन पोहोचलो आणि चोहीकडे पाहू लागलो. डोंगराच्या एका बाजूस लहानमोठ्या टेकड्या होत्या.

इतक्यात गुरुजी म्हणाले, ''समोर बघा. त्या तिकडे दूरवर पर्वत दिसत आहे. तो या डोंगरापेक्षा कितीतरी उंच व मोठा आहे आणि या बाजूच्या टेकड्या डोंगरापेक्षा लहान आहेत.''



१.२.२, २.२.१, २.२.३, ३.२.१, ३.२.२, ४.२.१, ५.२.१, ५.२.२



डोंगराच्या पायथ्याशी एक लहानशी दरी होती. दरीमधून एक झरा वाहत होता. तो अगदी लहानसा होता.

दरीकडे बोट दाखवून गुरुजी म्हणाले, "ही दरी आहे. या दरीतील तो झरा पाहा. कसा झुळझुळ वाहत आहे ! झरा मोठा असल्यास त्याला ओढा म्हणतात. ओढा मोठा असला, की त्यास आपण नदी म्हणतो."

झरा लहानसाच होता. तो शांतपणे झुळझुळ वाहत होता. झाडांना, झुडपांना, वेलींना पाणी देत होता. ती सारी टवटवीत दिसत होती. पक्षी आणि



गुरे झऱ्याचे थंडगार पाणी पिऊन संतुष्ट होत होती.

झरा इतका लहान, पण तो सर्वांच्या किती उपयोगी पडतो ! तो दुसऱ्यांना नेहमी पाणी देतो. उन्हाळ्यात तो कोरडा होतो, तेव्हा मेघ त्याच्या मदतीला येतात. ते पाऊस पाडतात. पाऊस पडला म्हणजे झरा पुन्हा वाहू लागतो. तो हवे त्याला पाणी देत जातो. स्वतःला मिळालेले पाणी दुसऱ्याला द्यायचे एवढेच त्याला माहीत !

सहल करून परत आलो. कितीतरी दिवस माझ्या डोळ्यांसमोरून तो झरा हालत नव्हता.

लेखक - श्यामराव चौधरी

संतुष्ट - तृप्त, समाधानी    मेघ - ढग

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे सांगा.** (२.२.३, ५.२.२)
  (१) झऱ्याचे पाणी कोण कोण पिऊन जात ?
  (२) मेघ झऱ्याच्या मदतीला का येतात ?
  (३) झऱ्याचा कोणता गुण तुम्ही घ्याल ?
  (४) झऱ्याप्रमाणे आणखी कोण कोण दुसऱ्याच्या उपयोगी पडतात ?

- **पाठातील शब्दांच्या आधारे वाक्ये पूर्ण करा.** (४.२.१)
  (१) ........ इतका लहान, पण तो सर्वांच्या किती ........ पडतो !
  (२) ........ मिळालेले ........ दुसऱ्याला द्यायचे एवढेच त्याला माहीत !

- **आकारानुसार चढत्या क्रमाने लिहा.** (४.२.१)
  डोंगर, पर्वत, टेकडी ........
  झरा, नदी, ओढा ........

- **पाठातील जोडाक्षर असलेले शब्द शोधा व लिहा.** (४.२.१)
  ........

- **हे शब्द असेच लिहा.** (४.२.१)
  पर्वत    संतुष्ट    नदी    पक्षी
  ........

# १७. वाहनांची मजा



खड खड खड खड गाडी करते
बैलगाडी ही मळ्यास जाते
वाजती घुंगरू रुम झुम झुम
चाक करितसे कुरूम कुरूम !



टप टप टप टप टांगा घोडा
आला आला रस्ता सोडा
घोडा काळा चपळही फार
टांगेवाला बडा हुशार !



पों पों पों पों मोटार आली
भरकन येऊन निघून गेली
डौल तिचा राणीचा फार
मजेमजेचे रंग आकार !



भक भक करते इंजिनगाडी
पाहा धुराची काळी दाढी
मागे मागे डबे धावती
नव्या नव्या गावा जाती !

१.२.२, २.२.१, २.२.२, २.२.३, ४.२.१, ५.२.२, ६.२.१, ९.२.१

रों रों रों रों करी विमान
पाहा करूनी वरती मान
पंख दोन ते कितीतरी छान
ढगांत हिंडे दावित शान !



कवी - राजा मंगळवेढेकर

चपळ - जोरात पळणारा बडा - मोठा
दावणे - दाखवणे शान - ऐट

## स्वाध्याय

❑ **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.** (२.२.३, ५.२.२)

(१) घुंगरांचा आवाज कसा येतो ?

..........

(२) टांगा कोण ओढतो ?

..........

(३) डबे कोणाच्या मागे मागे धावतात ?

..........

❑ **वाहन चालवणाऱ्याचे नाव माहीत करून घ्या. लिहा.** (९.२.१)

जसे — बैलगाडी — गाडीवान
टांगा — ..........
मोटार — ..........
विमान — ..........

- खालील अक्षरांचा योग्य क्रम जुळवून वाहनाचे नाव लिहा. (९.२.१)

जसे — न वि मा — विमान

य ल क सा — ..................

हा ज ज — ..................

र मो टा — ..................

क्षा रि — ..................

- मोकळ्या जागी योग्य ओळी लिहा. (४.२.१)

रों रों रों रों करी विमान

..........................................

..........................................

ढगांत हिंडे दावित शान !

- खालील शब्दांमागे 'वि' जोडून नवीन शब्द तयार करा. लिहा. (६.२.१)

जसे — नायक — विनायक

ख्यात — ..................

नम्र — ..................

शुद्ध — ..................

ज्ञान — ..................

- हे शब्द असेच लिहा. (४.२.१)

घुंगरू हुशार धूर विमान पंख

..........................................................................................

## नमुना चाचणी तिसरी

- **पूर्ण वाक्यात सांगा.** (५.२.२)

(१) विनूच्या आईने विनूला गऱ्यांचे द्रोण कोणा कोणाकडे पोचवायला सांगितले ?

(२) आईने विनूला काय लक्षात ठेवायला सांगितले ?

(३) सहलीला गेलेल्या मुलांनी काय काय पाहिले ?

(४) झरा केव्हा कोरडा पडतो ?

(५) कोणाचे डबे मागे मागे धावतात ?

(६) कोणत्या वाहनाला पंख असतात ?

- **कोण कोणास म्हणाले ? सांगा.** (२.२.३)

(१) "देतो तो देव आणि राखतो तो राक्षस."

(२) "अरे, हे तर आपले घरचे वैद्य (डॉक्टर) आहेत."

(३) "मला तर वाटतं, झाडासारखा मित्र नाही."

(४) "त्या तिकडे दूरवर पर्वत दिसत आहे."

- **का ते सांगा.** (५.२.२)

(१) विनूची समजूत पटली.

(२) आपण दारापुढे तुळस लावतो.

(३) मांजर दूर्वा खाते.

(४) मेघ झऱ्याला पाणी देतात.

- **उलट अर्थाचे शब्द लिहा.** (९.२.१)

जसे – मावळती × उगवती

थंड × .................... कोरडा × ....................

काळा × .................... भरकन × ....................



- **मूळ शब्दाच्या पाठीमागे 'सु' जोडून तयार होणारे शब्द लिहा.** (६.२.१)

**जसे** — विचार - सुविचार

.................................... ....................................

.................................... ....................................

.................................... ....................................



- **मोकळ्या जागी योग्य ओळी लिहा.** (४.२.३)

(अ) रंग ढगांवर मावळतीचा

....................................

झुळझुळ वारा नदीकाठचा

....................................



- **जोड्या जुळवा.** (७.२.१)

| | |
|---|---|
| खड खड खड करते | चाक |
| रुम झुम झुम वाजतात | मोटार |
| कुरूम कुरूम करते | बैलगाडी |
| टप टप टप टप करतो | विमान |
| पों पों पों पों करते | घुंगरू |
| भक भक करते | टांगाघोडा |
| रों रों रों करते | इंजिनगाडी |

# १८. एवढीशी चूक

रात्री बाबा मुलांना म्हणाले, "आज मी तुम्हांला नवीन गोष्ट सांगणार आहे !"

गोष्ट म्हणताच गीता व मोहन पटापट अंथरुणावर उठून बसले. "सांगा ना लवकर," गीता म्हणाली. मोहनही गोष्ट ऐकायला आतुर झाला.



बाबांनी गोष्ट सांगायला सुरुवात केली.

"गोष्टीचं नाव आहे 'एवढीशी चूक'."

"चुकीबद्दल गोष्ट ?" मुलांनी आश्चर्याने विचारले.

१.२.२, २.२.१, २.२.३, ३.२.१, ३.२.२, ४.२.३, ५.२.१, ५.२.२, ६.२.१

"हं," बाबा म्हणाले, "आणि ही गोष्ट ऐकल्यावर त्यातून काय शिकणार ते तुम्ही मला सांगायचं !"

"आधी गोष्ट सांगा ना !" गीता म्हणाली.

बाबांनी सुरुवात केली —

ही गोष्ट आहे संत एकनाथांची. त्यांच्या लहानपणीची. जनार्दनपंत हे त्यांचे गुरू. त्यावेळी शिक्षणासाठी एकनाथ जनार्दनपंतांच्या घरी राहत असत. गुरूंची सेवा करत. त्यांना कामात मनापासून मदत करत असत.

एकदा पंतांनी हिशेब करण्याची जबाबदारी एकनाथांवर सोपवली. छोटा एकनाथ हिशेब करत बसला. हिशेब जमेना. ताळा चुकू लागला. एकनाथाला समाधान वाटेना. रात्र झाली; तरी तो हिशेब तपासत बसला.





अर्धी रात्र उलटली. पंतांचा डोळा लागला. इतर सारेजणही झोपी गेले. एकनाथ मात्र झोपला नाही. दिव्याच्या उजेडात तो पुन्हा पुन्हा हिशेब करून पाहात होता.

मध्येच पंतांना जाग आली. एकनाथ एवढ्या रात्री काय करतो, हे पाहायला ते त्याच्या पाठीमागे येऊन उभे राहिले.

एवढ्यात 'सापडली!' म्हणून एकनाथाने आनंदाने टाळी वाजवली. पंतांनी विचारले, "काय सापडली, नाथा ?"

"चूक सापडली. हिशेबात एका पैची (पै - एक जुने नाणे) चूक झाली होती. ती सापडत नव्हती. आता ती सापडली!" एकनाथ म्हणाला.

पंत म्हणाले, "एकनाथा! चूक फक्त एका पैची! अन् तू एवढा वेळ शोधत बसलास! काम अचूक होण्यासाठी किती प्रयत्न करायचे हे तुझ्याकडून शिकावे! शाब्बास! चल, नीज आता. पहाट होत आली!"

गोष्ट संपली. बाबा म्हणाले, "मुलांनो, आवडली ना गोष्ट ? या गोष्टीतून तुम्ही काय शिकलात ते सांगा बरं."

मुले विचारात पडली. बाबा म्हणाले, "आता झोपा. खूप रात्र झाली. सकाळी उठल्यावर सांगा."

मोहन आणि गीता मनांत गोष्ट घोळवत झोपी गेले.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे सांगा.** (२.२.३, ५.२.२)
  (१) जनार्दनपंतांनी एकनाथांना शाबासकी का दिली ?
  (२) हिशेबातील चूक सापडल्यावर एकनाथांना काय वाटले असेल ?
  (३) गीता आणि मोहन यांनी सकाळी उठल्यावर बाबांना काय सांगितले असेल ?
- **गाळलेले शब्द लिहा. त्या शब्दांचा अर्थ समजून घ्या.** (४.२.१)
  (१) पंतांनी हिशेब करण्याची .......... एकनाथांवर सोपवली.

(२) हिशेबाचा .................. चुकू लागला.

(३) अर्धी रात्र ..................

- **चुकीच्या वाक्यांपुढे ☒ व बरोबर वाक्यांपुढे ☑ अशी खूण करा.** (२.२.३)

(१) शिकण्यासाठी एकनाथ शाळेत जात होते. ☐

(२) शिकण्यासाठी एकनाथ जनार्दनपंतांच्या घरीच राहत होते. ☐

(३) हिशेबातील चूक न शोधताच एकनाथ झोपी गेले. ☐

(४) हिशेबातील चूक सापडेपर्यंत एकनाथ झोपले नाहीत. ☐

- **खालील अर्थाचे पाठातील शब्द शोधा. त्यांचा तुमच्या वाक्यात उपयोग करा.** (४.२.३)

खूप उत्सुक होणे, मनातल्या मनात आठवणे, झोप लागणे, अजिबात न चुकता, अगदी लहानशी

- **खालील शब्दांच्या मागे 'प्र' जोडून नवीन शब्द तयार करा. लिहा.** (६.२.१) **जसे —** यत्न – प्रयत्न

गती – .................. शांत – ..................

बल – .................. सिद्ध – ..................

- **हे शब्द असेच लिहा.** (४.२.१)

गोष्ट आतुर गीता चूक नवीन

..................................................................

# १९. धाडसी शिवशंकर

शिवशंकर मधुकर बिद्री नावाच्या मुलाच्या साहसाची ही गोष्ट. अवघ्या दहा वर्षांचा हा मुलगा. गणेशोत्सवानिमित्त तो किल्लारी गावी आपल्या आजोळी गेला होता.

३० सप्टेंबर, १९९३ अनंत चतुर्दशी. त्या रात्री शिवशंकर गाढ झोपेत होता. अचानक त्याला जाग आली. घर थरथरत होते. भांडी वाजत होती. पत्र्यांचा आवाज येत होता. जमीन हालत होती. 'भूकंप', 'भूकंप' म्हणून माणसे ओरडत होती. शिवशंकरने 'भूकंप' शब्द ऐकला. त्याचे आजी-आजोबा गाढ



१.२.१, २.२.१, २.२.३, ३.२.१, ३.२.३, ४.२.१, ५.२.२, ६.२.१, ९.२.१

झोपेत होते. तो त्यांना गदागदा हालवू लागला. इतक्यात घराची मागील भिंत कोसळली.

"आजोबा, लवकर उठा, बाहेर चला," म्हणत शिवशंकर आजोबांना उठवून बाहेर नेऊ लागला. आजोबा थकलेले होते. त्यांचे पाय लटपटत होते. हात कापत होते. कसेबसे ते घराबाहेर पडले.



शिवशंकर आजोबांना म्हणाला, "तुम्ही इथे अंगणात बसा. मी आजीला आणतो."

"म्हणजे ती घरातच राहिली काय ?" असे म्हणत आजोबा मटकन खाली बसले. त्यांचे हातपाय गळाले. एखादया लहान मुलाप्रमाणे ते हुंदके देऊ

लागले. शिवशंकरने तिकडे लक्ष दिले नाही. आता त्याला आजीची काळजी वाटत होती. तो घरात धावत गेला.

वीज गेली होती. घरात अंधार होता. ''आजी, ए ऽ आजी, अग कुठे आहेस तू ?'' असे म्हणत तो आजीला हाका मारू लागला. आजीदेखील ''शंकर, शंकर,'' म्हणून ओरडत होती. ''मला वाचवा, मला वाचवा'' असा आजीचा आवाज त्याला ऐकू आला.



आवाजाच्या दिशेने शिवशंकर तिच्याजवळ पोचला. तो आजीला धीर देत म्हणाला, ''आजी, चल पटकन बाहेर. आजोबा बाहेर अंगणात आहेत. ते सुखरूप आहेत.''

दोघेही घराबाहेर आली. शिवशंकरला आजोबांनी मिठी मारली. आजी, आजोबा दोघांच्याही डोळ्यांतून अश्रू वाहू लागले.

आजी शिवशंकरला पोटाशी घेऊन म्हणाली, "लेकरा, तुझ्यामुळे आज आमचा जीव वाचला."

शिवशंकरच्या आई-बाबांना ही गोष्ट समजली, तेव्हा त्यांना शिवशंकरचा खूप अभिमान वाटला.

या साहसाबद्दल शिवशंकरला राष्ट्रीय वीरता पुरस्कार व राष्ट्रीय बाल शौर्य पुरस्कार मिळाले. त्यावेळचे राष्ट्रपती डॉ. शंकरदयाळ शर्मा व पंतप्रधान पी. व्ही. नरसिंहराव यांच्या हस्ते हे पुरस्कार शिवशंकरला देण्यात आले.

लेखक - दत्ता टोळ

मागील वर्षी काही जोडाक्षरांचा अभ्यास झाला आहे. यावर्षी या पुस्तकातील भाषिक खेळ १ मध्ये 'र' च्या जोडाक्षरांचा अभ्यास दिला आहे. वरील पाठात 'अश्रू' या शब्दात '**श्र**' हे जोडाक्षर आले आहे. जोडाक्षराची फोड करताना **श + र** असे दाखवले जाते; पण लिहिताना '**श्र**' असे लिहिले जाते. हे मुलांना समजावून द्यावे.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे सांगा.** (२.२.३, ५.२.२)
  - (१) शिवशंकरच्या आईबाबांना शिवशंकरचा अभिमान का वाटला ?
  - (२) शिवशंकरला त्याच्या धाडसाबद्दल कोणते पुरस्कार मिळाले ?

❑ योग्य पर्यायापुढे ☑ अशी खूण करा. (२.२.३)

शिवशंकर अचानक जागा झाला, कारण –

(१) त्याला स्वप्न पडले. ☐

(२) त्याला आजीने उठवले. ☐

(३) भूकंपाने जमीन हालली, पत्रे वाजले, भांडी वाजली. ☐

आजी-आजोबांच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले, कारण –

(१) त्यांच्या घराची भिंत भूकंपात कोसळली. ☐

(२) नातवाने सर्वांना संकटातून वाचवले, म्हणून फार बरे वाटले. ☐

(३) आजीला बाहेर आणायला शिवशंकरला वेळ लागला. ☐

❑ 'ओरड' शब्दाला 'णे' प्रत्यय लावून 'ओरडणे' असा शब्द तयार होतो. याप्रमाणे खालील शब्दांना 'णे' प्रत्यय लावून लिहा. (६.२.१)

| | | | |
|---|---|---|---|
| ठेव – | .................... | ओढ – | .................... |
| वाच – | .................... | काप – | .................... |
| कर – | .................... | जा – | .................... |
| ये – | .................... | खा – | .................... |

- खालील शब्दांच्या पुढे 'रूप' जोडून नवीन शब्द तयार करा. लिहा. (६.२.१)

जसे — सुख – सुखरूप

तीर्थ – ..........................

एक – ..........................

स्व – ..........................

शब्द – ..........................

देव – ..........................

- पाठात आलेले 'मटकन', 'पटकन' यांसारखे आणखी पाच शब्द लिहा. (९.२.१)

..........................................................................................

..........................................................................................

- शिवशंकरचे मित्र आणि शाळेतील शिक्षक त्याला भेटल्यावर काय म्हणाले असतील ?

- हे शब्द असेच लिहा. (४.२.१)

सुटी भूकंप भिंत वीज जीव

..........................................................................................

..........................................................................................

# २०. मी कोण ?



आई बाबांचा 'बाळ'
असे एकटा लडिवाळ.



काका काकूपण मजला
'पुतण्या' म्हणती ती अपुला.



आत्या, मामा नि मामी
म्हणती त्यांचा 'भाचा' मी.



आजी आजोबा दोघेजण
सांगती तू 'नातू' म्हणून.



'सुशी' आमुची सोनुकली
'दादा' मज हाका मारी.



मामांचा वसंत आला
प्रश्न तयाला मी केला –

असे तुझा तरी मी कोण ?
तो बोले मज हासून –

'आतेभाऊ' तू माझा
पण मी 'मामेभाऊ' तुझा.

१.२.२, २.२.१, २.२.२, २.२.३, ४.२.१, ५.२.२, ९.२.१

निरनिराळी मज नावे
का अशी ते सांगावे.

कवी - ग. म. वैद्य

| | |
|---|---|
| लडिवाळ - लाडका | मजला - मला |
| सोनुकली - लहान, धाकटी | मज - मला |
| तयाला - त्याला | |

## स्वाध्याय

❑ **पूर्ण वाक्यात उत्तरे सांगा.** (२.२.३, ५.२.२)

(१) 'सुशी' बाळाची कोण ?

(२) वसंत मामांचा कोण ?

(३) वसंत बाळाचा कोण ?

(४) बाळ वसंताचा कोण ?

❑ **'बाळा'ला कोण काय म्हणतो ते त्यांच्यासमोर लिहा.** (२.२.३)

आत्या-मामा ..............................

आजी-आजोबा ..............................

काका ..............................

वसंत ..............................

❑ **हे शब्द असेच लिहा.** (४.२.१)

प्रश्न म्हणून तरी नातू

..............................

# २१. रवी शहाणा झाला

रविवारचा दिवस होता. रवी अजून झोपलाच होता. सूर्याची किरणे रवीच्या डोळ्यांवर आली. त्या किरणांनी त्याला झोपेतून उठवले. रवीला सूर्याचा खूप राग आला. अंथरुणावर लोळताना रवीने ठरवले, आज खूप खेळायचे, रानात फिरायचे.

मग रवी घाईने उठला. त्याने अंघोळ केली आणि मोठ्याने म्हणाला, ''आई, मी चाललो ग.''

आई म्हणाली, ''अरे रवी, थांब. जाता जाता एवढं दळण टाक गिरणीत.''



१.२.१, १.२.२, १.२.३, २.२.१, २.२.३, ३.२.१, ३.२.३, ४.२.१, ५.२.२, ६.२.१, ८.२.१, ९.२.१

"आई, मला नाही वेळ दळणबिळण टाकायला. मी चाललो खेळायला." असे म्हणून रवी पुढे निघाला.

शेजारच्या पाटीलकाकांनी त्याला पाहिले आणि हाक मारली, "अरे रवी, जरा एवढे पत्र टाक रे पोस्टाच्या पेटीत. रोज मी आपला विसरूनच जातो बघ."

"मला नाही वेळ पत्रबित्र टाकायला." असे म्हणून रवी पुढेच निघाला.



वाटेत त्याला भेटली एक आजीबाई. तिच्यासमोर होती लाकडाची मोळी. रवीला पाहताच ती म्हणाली, "अरे बाळा, मोळी उचलायला जरा हात लाव रे."

"आजीबाई, मला नाही वेळ मोळीबिळी उचलायला." असे म्हणून रवी आपला पुढेच निघाला. त्याने मागे वळूनसुद्धा बघितले नाही.



मग रवी रानात पोचला. रंगीबेरंगी रानफुले डोलत होती. फुलपाखरे या फुलांवरून त्या फुलांवर उडत होती. रवीला खूप गंमत वाटली. तो हळूच एका फुलपाखराच्या मागे गेला. रवी त्याला पकडणार एवढ्यात ते उडून गेले. रवी पुन्हा हळूहळू त्याच्या मागे गेला. त्याला पकडणार एवढ्यात जवळच्या झाडाखाली बसलेले एक आजोबा म्हणाले, "बाळ, मी खूप थकलो आहे रे. खूप तहान लागली आहे. जरा मला पाणी आणून देतोस का ?"

"मला नाही वेळ पाणीबिणी आणून द्यायला. मी आहे कामात." असे म्हणून रवी पुन्हा फुलपाखरांच्या मागे धावला. धावता धावता मध्येच तो अडखळला आणि जोरात पडला. गुडघ्याला खूपच खरचटले. रवीला एकदम रडू आले. तो मोठ्याने रडू लागला. तेव्हा झाडाखाली बसलेले आजोबा रवीसाठी पाणी घेऊन आले. रवीला पाणी पाजून ते प्रेमाने म्हणाले, "बाळ, फार लागले का रे तुला ?"

पाणी पिऊन रवीला थोडे बरे वाटले. हे प्रेमाचे





बोलणे ऐकून रवी गुडघ्याच्या वेदना क्षणभर विसरला आणि एकदम त्याच्या मनात विचार आले – याच आजोबांना आपण मघाशी पाणी दिले नाही; पण तेच आजोबा आपल्याशी किती प्रेमाने वागत आहेत. थोड्या वेळापूर्वी त्या मोळीवाल्या आजीबाईंना मदत केली नाही. पाटीलकाकांचे कामही केले नाही आणि आईचेही ऐकले नाही. आपण किती वाईट वागलो !

रवीने ठरवले, आता यापुढे आपण नीट वागायचे, सगळ्यांना मदत करायची. आजोबांची माफी मागून तो घरी निघाला. वाटेत रवीने आजीबाईंना मोळी उचलायला मदत केली. पाटील काकांचे पत्र पत्रपेटीत नेऊन टाकले आणि घरातून दळण घेऊन तो गिरणीत

निघाला, तेव्हा त्याची आई त्याच्याकडे कौतुकाने पाहतच राहिली.

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.** (२.२.३, ५.२.२)

  (१) रवीला आईने कोणते काम सांगितले ?

  ..........................................................................

  (२) रवीला आपल्या गुडघ्याच्या वेदनांचा विसर का पडला ?

  ..........................................................................

  (३) रवीने शेवटी काय ठरवले ?

  ..........................................................................

- **पाठात 'दळण' या मूळ शब्दाला 'बिळण' शब्द जोडून आला आहे. पाठात यासारखे आणखी काही शब्द आले आहेत. ते शोधा आणि लिहा.** (६.२.१)

  ..........................................

  ..........................................

  ..........................................

- **हे शब्द असेच लिहा.** (४.२.१)

  सूर्य रवी हळूहळू पत्र फूल फुलपाखरू

  ..........................................................................

  ..........................................................................

# २२. मुंग्यांचा विजय

एक होते जंगल. जंगलातील झाडांवर छोटे मोठे पक्षी, माकडे, खारी, कीटक आनंदाने राहायचे.

त्या जंगलात एक हत्ती राहात होता. तो आपल्या मोठ्या डोक्याने झाडांवर धडका मारायचा. झाडे खाली पडायची. पक्ष्यांची घरटी मोडून जायची. अंडी फुटायची. पक्षी भरारा उडायचे. छोटे छोटे प्राणी इकडे तिकडे पळायचे. सारे मग दुसऱ्या झाडावर जायचे.



१.२.१, १.२.२, २.२.१, २.२.३, ३.२.३, ४.२.१, ५.२.२, ९.२.१



सगळ्यांची धावपळ बघून हत्ती हसायचा. सारे प्राणी, पक्षी दुसऱ्या झाडाकडे गेले, की तोही तिकडे जायचा. ते झाड पाडायचा. मग प्राणी, पक्षी तिसऱ्या झाडाकडे जात. हत्ती तेही झाड पाडायचा.

शेवटी, सर्वांनी मिळून हत्तीला विनंती केली, की त्याने उगीचच झाडे पाडू नयेत. दुसऱ्यांना त्रास देऊ नये. त्याने सुखात राहावे. इतरांनाही सुखाने राहू द्यावे.

हत्ती म्हणाला, ‘‘तुम्ही कोण मला सांगणार ? मी आहे इथला राजा. मला हवं ते मी करणार !’’ असे म्हणून हत्तीने सोंडेने एक झाड उपटले. त्या झाडाच्या जवळच मुंग्यांचे भले मोठे वारूळ होते. त्यात खूप मुंग्या राहायच्या.

मुंग्या हत्तीला म्हणाल्या, ‘‘हत्तीदादा, हत्तीदादा ! आमचं घर पाडू नकोस रे.’’



इवल्याशा मुंग्यांनी दादा म्हटलेले हत्तीला आवडले नाही. तो म्हणाला, ''दादा नाही, राजा म्हणा मला, राजा.''

एक मुंगी म्हणाली, ''राजा दुसऱ्यांचं रक्षण करतो, त्यांची घरं नाही पाडत तुझ्यासारखी !''

हत्ती आता मात्र फारच चिडला.

''ए, चिमुरडे ! फारच बोलते आहेस.'' असे म्हणत, तो रागारागाने मुंग्यांचे वारूळ सोंडेने पाडू लागला. त्याबरोबर वारुळातल्या सगळ्या मुंग्या बाहेर पडल्या आणि हत्तीच्या सोंडेत शिरल्या. सोंडेच्या आतील नाजूक कातडीचा त्यांनी कडकडून चावा घेतला. ची ची ची करत हत्ती ओरडायला लागला. त्याला काही सुचेना. त्याने आपली सोंड झाडाच्या खोडावर धडाधड आपटायला सुरुवात केली. आपटून आपटून हत्तीचीच सोंड दुखावली. हत्ती रडकुंडीला आला. मुंग्यांना बाहेर येण्यासाठी विनवू लागला.

मुंग्या म्हणाल्या, ''इथून दूर जाशील की नाही ?''

हत्ती म्हणाला, ''हो हो ! जाईन.''

''झाडं पाडायचं सोडून देशील की नाही ?''

''हो हो ! झाडं पाडणं सोडून देईन !''

मग, हत्तीच्या सोंडेतून साऱ्या मुंग्या भराभर बाहेर आल्या, तसा हत्ती मान खाली घालून निघून गेला.



सगळ्या पक्ष्यांना, प्राण्यांना, कीटकांना आनंद झाला. इवल्याशा मुंग्यांच्या एकजुटीमुळे आणि धाडसामुळे साऱ्यांचे संकट टळले. सगळ्यांनी मुंग्यांना शाबासकी दिली.

लेखिका - उज्ज्वला केळकर

चिमुरडी - लहानशी  मान खाली घालणे - अपमानित होणे

## स्वाध्याय

- **पूर्ण वाक्यात उत्तरे सांगा.** (२.२.३, ५.२.२)

  (१) जंगलात कोण कोण राहात होते ?

  (२) जंगलातील प्राणी, पक्षी, कीटक यांच्यावर कोणामुळे संकट आले ?

  (३) जंगलातील प्राणी, पक्षी, कीटक यांच्यावरील संकट कोणत्या कारणामुळे टळले ?

- **कंसातील योग्य शब्द निवडून गाळलेल्या जागा भरा.** (४.२.१)

  (कडकडून, धडका, धावपळ)

  (१) सगळ्यांची .................... बघून हत्ती हसायचा.

  (२) आपल्या मोठ्या डोक्याने हत्ती झाडांवर ........ मारायचा.

  (३) सोंडेच्या आतील भागाचा त्यांनी .......... चावा घेतला.

- **उलट अर्थाचे शब्द लिहा.** (९.२.१)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| छोटे | × | .................... | उंच | × | .................... |
| इकडे | × | .................... | खूप | × | .................... |

- **जोड्या जुळवा.** (९.२.१)

| | |
|---|---|
| उंच | वारूळ |
| ताकदवान | झाडे |
| मोठे | हत्ती |

- **हे शब्द असेच लिहा.** (४.२.१)

  कीटक     की     एकजूट

  ..........................................................................

# २३. पत्राचा प्रवास

"मधू, ए मधू" आजोबांनी हाका मारल्या.

"काय हो आजोबा ?" मधूने मागच्या अंगणातून खेळता खेळताच विचारले.



"अरे, चल माझ्याबरोबर," आजोबा चपला घालत म्हणाले.

मधूने चेंडू घरात टाकला आणि ताबडतोब चपला घालून तोही निघाला. आजोबांबरोबर जायचे

१.२.१, १.२.२, २.२.१, २.२.३, ३.२.३, ४.२.१, ४.२.३, ५.२.२, ९.२.१

म्हणजे काहीतरी नवीन पाहायला मिळणार, हे त्याला चांगले ठाऊक होते. ''द्या मी धरतो तुमची पिशवी.'' असे म्हणत मधूने त्यांची पिशवी घेतली.

आजोबा आणि मधू पायी पायी निघाले. कोपऱ्यावरून वळून पुढे गेले. ''आता इथे जरा थांबूया,'' पत्रपेटीपाशी थांबत आजोबा म्हणाले.

''इथे ?'' मधूने किंचित आश्चर्याने विचारले. इथे तर काहीच गंमत नाही, असे त्याच्या मनात आले. त्याचा चेहरा पडला.

''हे पत्र पेटीत टाक,'' आजोबांनी सांगितले. मधूने तसे केले.



तेवढ्यात थैली घेऊन एक पोस्टमन आला. त्याने पत्रपेटीचे कुलूप उघडले. मधू तिकडे लक्षपूर्वक पाहू लागला. पोस्टमनने पेटीच्या आतील पत्रे आपल्या थैलीत भरून घेतली. परत कुलूप लावून तो थैली घेऊन निघाला. ''ही पत्रे घेऊन पोस्टमनकाका कुठं जातात ?'' मधूने आजोबांना प्रश्न विचारला. त्यावर आजोबा म्हणाले, ''चल पुढे तुला सगळं सांगतो.''



आजोबा आणि मधू तेथून जवळच्या पोस्टात गेले. तिथे तार, मनिऑर्डर, पार्सल असे लिहिलेल्या छोट्या छोट्या खिडक्या होत्या. आत जाण्याची परवानगी आजोबांनी आधीच घेऊन ठेवली होती.

आत एका टेबलापाशी दोन माणसे पत्रांवर शिक्के मारत होती. शिक्के मारून झाल्यावर गावांनुसार पत्रे वेगवेगळ्या ढिगांत ठेवली जात होती.

"हं ... पोस्टमनच्या थैलीतून पत्रं आधी इथे येतात तर !" मधू म्हणाला. आजोबांनी मान डोलावली.

आजोबा आणि मधू बाहेर आले. पत्रांनी भरलेल्या थैल्या बाहेर एका लाल गाडीत टाकल्या जात होत्या.




"आता इथून पत्रं कुठं जातील ?" मधूने कुतूहलाने विचारले.

"बसस्टँडवर, रेल्वेस्टेशनवर," आजोबा म्हणाले.

"तिथून पुढे ?" मधू म्हणाला.

‘‘पुढे बसमधून, आगगाडीतून वेगवेगळ्या गावाला.’’ आजोबा म्हणाले.

‘‘पत्रं त्या त्या गावाला पोचली की मग ?’’ पुन्हा मधूचा प्रश्न.

आजोबांनी समजावत सांगितले, ‘‘मग तिथल्या पोस्टात ती आधी जातात. तिथे पुन्हा त्यांवर त्या गावचा शिक्का मारतात आणि मग....’’ आजोबांचे वाक्य मध्येच तोडून मधू म्हणाला,

‘‘पोस्टमनकाका पत्ता बघून पत्र घरी पोचवतात !’’

बोलत बोलत ते घरापाशी पोचलेसुद्धा ! घरात गेल्यावर मधू आईबाबांना म्हणाला,

‘‘आई, बाबा मी तुम्हांला पत्राच्या प्रवासाची गोष्ट सांगू का ?’’

आणि मधू आपल्या आईबाबांना पत्राच्या प्रवासाची गोष्ट सांगू लागला —

## स्वाध्याय

- का ते लिहा. (२.२.३, ५.२.२)

(१) आजोबांनी हाक मारताच मधू ताबडतोब निघाला.

.....................................................................

(२) पोस्टमनने पत्रपेटीचे कुलूप उघडले.

(३) पत्रांच्या थैल्या लाल गाडीत भरल्या जात होत्या.

**योग्य अर्थ निवडून जोड्या जुळवा.** (९.२.१)

| | |
|---|---|
| • पायी पायी | थोडेसे |
| ताबडतोब | चालत |
| किंचित | लगेचच |
| • लक्षपूर्वक पाहणे | 'हो' म्हणणे |
| मान डोलावणे | नाराज होणे |
| चेहरा पडणे | मन लावून बघणे |

**पुढील चित्रे पाहा. पत्रांचे प्रकार माहीत करून घ्या व नावे लिहा.** (४.२.३)





**हे शब्द असेच लिहा.** (४.२.१)

पुढे लक्षपूर्वक कुलूप

# २४. अक्कू बक्कू



आमच्या घरात मांजरे येतात
त्यांना छुत छुत करायचे नसते
अक्कू त्यांना फिस फिस करते
बक्कू पुढ्यात दूध ठेवते.



आमच्या अंगणात चिमण्या कावळे
त्यांना हुश हुश करायचे नसते
अक्कू टोपलीत तांदूळ आणते
बक्कू मुठीने फेकत बसते.



आमच्या फाटकात कुत्री येतात
त्यांना हड हड करायचे नसते
अक्कू त्यांना यू यू म्हणते
बक्कू भाकर आणून देते.

१.२.१, १.२.३, २.२.२, २.२.३, ३.२.३, ४.२.१, ५.२.१, ५.२.२

आमच्या कुंपणाशी गायी येतात
त्यांना हैक हैक करायचे नसते
अक्कू त्यांना गोंजारत राहते
बक्कू आणून चारा देते.



आमच्या कपाटात झुरळे दिसतात
त्यांना मात्र हाकलायचे असते
अक्कू झाडू आणून देते
बक्कू त्यांना पळवून लावते.



कवयित्री - इंदिरा

## स्वाध्याय

- पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा. (२.२.३, ५.२.२)
  (१) बक्कू कोणापुढे दूध ठेवते ?
  ..............................
  (२) अंगणात कोणकोणते पक्षी येतात ?
  ..............................
  (३) अक्कू बक्कूला झाडू का देते ?
  ..............................

- बक्कू कोणाला काय देते ते त्यांच्या नावांसमोर लिहा. (५.२.१)
  मांजर ..............................
  चिमणी ..............................

गाय ..............................

कुत्रा ..............................

- कंसातील योग्य शब्द निवडून रिकाम्या जागी लिहा. (४.२.१)

(छुत छुत, हड हड, हुश हुश, हैक हैक)

(१) गाईंना .................... करायचे नसते.

(२) कावळ्यांना .................... करायचे नसते.

(३) मांजरांना .................... करायचे नसते.

(४) कुत्र्यांना .................... करायचे नसते.

- चौकटीत पाच पक्ष्यांची नावे लपलेली आहेत. ती शोधा. लिहा. (४.२.१)

| त | णी | घा | का |
|---|---|---|---|
| पो | बु | | प |
| म | व | र | चि |
| ळा | | ट | क |

..............................

..............................

..............................

..............................

- हे शब्द असेच लिहा. (४.२.१)

मूठ, तांदूळ, कुंपण, झुरळ

..............................

## नमुना चाचणी चौथी

- **पूर्ण वाक्यात सांगा. लिहा.** (५.२.२)

(१) एकनाथ रात्रभर का जागत बसला होता ?

(२) शिवशंकर आजोबांना गदागदा का हालवू लागला ?

(३) रवीला सूर्याचा राग का आला ?

(४) मुंग्या हत्तीला काय म्हणाल्या ?

(५) झुरळांना का हाकलायचे असते ?

- **मोकळ्या जागी कंसातील योग्य शब्द वापरून वाक्ये पूर्ण करा.** (४.२.१)

(रवीसाठी, मुंग्यांचे, शिवशंकरचा, हत्तीला, एकनाथांवर)

(१) एकदा पंतांनी हिशेब करण्याची जबाबदारी .................. सोपवली.

(२) आईबाबांना .................. अभिमान वाटला.

(३) झाडाखाली बसलेले आजोबा .................. पाणी घेऊन आले.

(४) झाडाच्या जवळच .................. भले मोठे वारूळ होते.

(५) इवल्याशा मुंग्यांनी दादा म्हटलेले .................. आवडले नाही.

- **असे कोण कोणास म्हणाले ?** (२.२.३)

(१) "काम अचूक होण्यासाठी किती प्रयत्न करायचे हे तुझ्याकडून शिकावे."

(२) "आजोबा बाहेर अंगणात आहेत. ते सुखरूप आहेत."

(३) 'आतेभाऊ' तू माझा । पण मी 'मामेभाऊ' तुझा.

(४) "बाळ, जरा मला पाणी आणून देतोस का ?"

(५) "राजा दुसऱ्यांचं रक्षण करतो, त्यांची घरं नाही पाडत तुझ्यासारखी !"

- **समान अर्थाचे शब्द लिहा.** (९.२.१)

आश्चर्य .................. प्रयत्न ..................

साहस .................. आई ..................

- चटकन, पटकन यांसारखे पाच शब्द लिहा. (९.२.१)

.....................................................................

- योग्य घटनाक्रम लावा. (५.२.१)

पत्रावर पोस्टात शिक्का बसला.

मीनाने पत्र पत्रपेटीत टाकले.

तिथल्या पोस्टमनने मीनाच्या मामांना पत्र दिले.

मीनाने मामांना पत्र लिहिले.

पत्रपेटीतून पत्र पोस्टमनने थैलीतून पोस्टात नेले.

लाल गाडीतून पत्र रेल्वेस्टेशनवर गेले.

पत्र मामांच्या गावी पोचले.

पत्राने आगगाडीतून प्रवास केला.

.....................................................................

.....................................................................

.....................................................................

.....................................................................

.....................................................................

.....................................................................

.....................................................................

.....................................................................

# भाषिक खेळ — २

खाली दिलेल्या प्रत्येक चौकटीतील अक्षरांपासून प्रत्येकी एक वाक्प्रचार तयार होतो. प्रत्येक चौकटीतील अक्षरे योग्य क्रमाने जुळवून वाक्प्रचार तयार करा.

|  | न | नि |
|---|---|---|
| अं | कू | घ |
| ग | शे | णे |

| हा | गा | त |
|---|---|---|
|  | ळ |  |
| पा | णे | य |

| डो | ड | कू |
|---|---|---|
| के | स | न |
| णे | घ | नि |

| मा |  | खा |
|---|---|---|
| घा | ल | णे |
| न |  | ली |

| डो |  | न |
|---|---|---|
| मा | व |  |
|  | णे | ला |

